**अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी पोलीस शिपाई भरतीपूर्व प्रशिक्षण योजनेच्या अंमलबजावणीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पोभप्र-२०२०/प्र.क्र.०७/का-९,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ ऑगस्ट, २०२०.

वाचा :-१) अल्पसंख्याक विकास विभाग,शा.नि. क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१८८/०९/का-१, दि.२७.७.२००९.
२) अल्पसंख्याक विकास विभाग,शा.नि. क्र. अविवि-२००९/प्र.क्र. १८८/०९/का-१, दि. २९.०८.२००९.
३) अल्पसंख्याक विकास विभाग,शा.नि. क्र. पोभप्र-२०१८/प्र.क्र.५२/का-९, दि.०१/०९/२०१८

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या१५ कलमी कार्यक्रमातंर्गत दिलेल्या सूचनांनुसार अल्पसंख्याक समाजामधील उमेदवारांना स्पर्धात्मक परिक्षेमध्ये समान संधी मिळण्याच्या दृष्टीने तसेच शासकीय सेवेमध्ये अल्पसंख्याकांचे असलेले अत्यल्प प्रमाण विचारात घेऊन अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी पोलिस शिपाई भरती पूर्व प्रशिक्षण योजना संदर्भाधीन दि. २७ जुलै २००९ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. दिनांक २९.०८.२००९ च्या शासन निर्णयान्वये सदर योजनेमध्ये अंशत: सुधारणा करण्यात आल्या आहेत. सदर योजना महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या नियंत्रणांतर्गत जिल्हाधिकारी कार्यालयाकडून राबविण्यात येत होती. सदर योजना शासन निर्णय दि.०१/०९/२०१८ अन्वये महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगा ऐवजी अल्पसंख्याक विकास विभागाच्या नियंत्रणांतर्गत जिल्हाधिकारी कार्यालयाकडून राबविण्याच्या निर्णय घेण्यात आला आहे. सदर योजनेंतर्गत शासन निर्णय दि. २७/०७/२००९ मध्ये कमाल १०० उमेदवारांची निवड करुन त्यांना प्रशिक्षण देण्याची तरतूद करण्यात आली आहे. तथापि, किमान किती उमेदवारांना प्रशिक्षण द्यावे ही बाब स्पष्ट करण्यात आलेली नाही. सबब, सदर योजनेंतर्गत अल्पसंख्याक समुहाच्या किमान किती उमेदवारांना प्रशिक्षण द्यावे, ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी पोलीस शिपाई भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण योजना राबविण्यात येत आहे. सदर योजने मध्ये शासन निर्णय दि. २७ जुलै,२००९ मध्ये नमूद केल्यानुसार प्रशिक्षणासाठी उमेदवारांची निवड करतानां गृह विभागाद्वारे निश्चित केलेली शैक्षणिक अर्हता व शारिरीक पात्रता धारण करणाऱ्या अल्पसंख्याक समुहाचा लोकसंख्येच्या प्रमाणात प्रत्येक जिल्हयात **कमाल१००** अल्पसंख्याक समुहातील उमेदवारांची जिल्हा स्तरीय निवड समिती मार्फत निवड करुन त्यांना शासन स्तरावर निवड करण्यात आलेल्या खाजगी प्रशिक्षण संस्थेमार्फत प्रशिक्षण देण्यात येते. आता सदर प्रशिक्षणाकरीता प्रति जिल्हा किमान **३०** व कमाल **१००** अल्पसंख्याक समुहातील उमेदवारांना प्रशिक्षण देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. शासन स्तरावर निवड करण्यात आलेल्या खाजगी प्रशिक्षण संस्थानी संबधित जिल्हामध्ये सदर प्रशिक्षण कार्यक्रमाकरीता किमान ३० उमेदवार जरी पात्र ठरत असले तरी त्यांचे पोलीस शिपाई भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण घेणे बंधनकारक करण्यात येत आहे. याबाबत संबधित जिल्हाचे जिल्हाधिकारी यांनी प्रशिक्षणार्थीची निवड करताना शासन निर्णय दि. २७/०७/२००९ मध्ये नमूद तरतूदीनुसार अल्पसंख्याक समुहाच्या लोक संख्येच्या प्रमाणात निवड करण्यात येईल, याची दक्षता घ्यावी.

३.  याव्यतिरिक्त सदर योजना राबविताना उपरोक्त शासन निर्णय दि. २७ जुलै, २००९, २९ ऑगस्ट, २००९ व ०१ सप्टेंबर,२०१८ मध्ये विहित केलेल्या सर्व अटी शर्ती,कालावधी व अंमलबजावणीची कार्यपध्दती व इतर बाबी आहे तशाच लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८१४१३०८१०९७१४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.08.14 13:18:35 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.राज्यालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा. मंत्री/ राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग,
७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर,
८. पोलीस महासंचालक,
९. पोलीस आयुक्त (सर्व)
१०.विशेष पोलीस महानिरिक्षक (सर्व)
११.जिल्हा पोलीस अधिक्षक (सर्व)
१२.संचालक, लेखा व कोषागारे
१३.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१५.सर्व विभागीय आयुक्त,
१६.सर्व जिल्हाधिकारी,
१७.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१९.उपसचिव, वित्त विभाग व्यय-४, मंत्रालय, मुंबई
२०.उप सचिव, नियोजन विभाग- १४७५, मंत्रालय, मुंबई
२१.निवड नस्ती.